अधिव्याख्याता, इंटिरिअर डिझाईन, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्तीबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः ससेनि-३२१४/प्र.क्र.५७/१४/तांशि -७
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ० ६सप्टेंबर, २०१४

**संदर्भ :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१५(२)(२०४४ओ)/१३६५४/सात, दि. १९/०३/२०१४ चे पत्र.**

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवारांची अधिव्याख्याता, इंटिरिअर डिझाईन, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर त्यांच्या नावासमोर रकाना क्र . ६ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | गुणवत्ता क्र. | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियुक्तीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १. | १ | श्रीमती नविता पुंडलिक आडके | अराखीव | अराखीव असलेल्या एका पदासाठी | शासकीय तंत्रनिकेतन, नाशिक येथे रिक्त असलेल्या अधिव्याख्याता, इंटिरिअर डिझाईन या पदावर | ------- |
| २. | २ | श्रीमती विशाखा संजय पाटील | इ.मा.व. | अराखीव महिला वर्गवारीसाठी राखीव असलेल्या एका पदासाठी | शासकीय तंत्रनिकेतन, नाशिक येथे रिक्त असलेल्या अधिव्याख्याता, इंटिरिअर डिझाईन या पदावर | संगणक हाताळणी/ वापराबाबतचे प्रमाणपत्र (MS-CIT)सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून |

०२. गुणवत्ता क्र. २ येथील मागासवर्गीय उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले असून त्यानुसार त्यांचा जाती दावा वैध ठरविण्यात आलेला आहे .

०३. गुणवत्ता क्र. २ येथील उमेदवाराने संगणक हाताळणी/वापराबाबतचे प्रमाणपत्र शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/३/२००३ नुसार आवश्यक असून नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत संगणक हाताळणी/वापराबाबतचे प्रमाणपत्र सादर

करणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र सादर केले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

०४. उपरोक्त उमेदवारांना वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्टया शासकीय सेवेसाठी पात्र ठरविले आहे. तशी नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

०५. उक्त नमूद ०२ उमेदवारांची अधिव्याख्याता, इंटिरिअर डिझाईन, शासकीय तंत्रनिकेतन, महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा, गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमेदवारांची वेतनश्रेणी रु. १५,६००-३९,१००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२ दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांना प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवारांचे परिवीक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.७/८/२००१ अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

६) सदर उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

७) सदर उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

८) परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या

गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

९) सदर उमेदवारांना वित्त विभाग शासन निर्णय क्र.अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दि.३१/१०/२००५ अन्वये निर्धारित केलेली नवीन परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना (Defined Contribution Pension Scheme) लागू ठरेल.

१०) सदर उमेदवारांचे प्रचलित नियमानुसार सेवानिवृत्तीचे वय ६० राहील.

११) उमेदवारांना नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१२) सदर उमेदवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०६. सदर नियुक्ती उमेदवारांनी सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबुन राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्ती नंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवारांची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०७. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावासंस्थाप्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालकामार्फत . .शासनास सादर करावा

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०६११२९२६१६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Panditrao Shastri

Digitally signed by Sudhir Panditrao Shastri
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sudhir Panditrao Shastri
Date: 2014.09.06 11:24:45 +05'30'

**सुधीर पं. शास्त्री**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित उमेदवार (नोंदणीकृत डाकेने)(e-mail द्वारे)

**प्रत,**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
५. सहसंचालक तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय , नाशिक.
६. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, नाशिक.
७. (वरील उमेदवारांना रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणीक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी या आदेशातील ज्या उमेदवारांची नियुक्ती संगणक हाताळणी वापराबाबतचे / प्रमाणपत्रप्राप्त करुन घेण्याच्या अटीच्या अधिन राहुन केली आहे त्या उमेदवारांकडून विहीत मुदतीत या अटीची पुर्तता करुन घेवून त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)

८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-२, नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक .
१०. निवड नस्ती (तांशि-७).